**सामाजिक वनीकरण संचालनालय**
**वन विभागामध्ये समाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महसुल व वन विभाग
शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१४/प्र.क्र.१८८/फ-५
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२
दि. ४ डिसेंबर २०१४.

**प्रस्तावना -**

सामाजिक वनीकरण संचालनालय हे वानिकी क्षेत्रातील प्रमुख घटक आहे. त्यापैकी वन विभाग हा महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असून सामाजिक वनीकरण संचालनालय हे ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या नियंत्रणाखाली कार्यरत आहे.

सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या निर्मिती मागील प्रमुख उद्देश जळाऊ, वैरण व किरकोळ इमारती मालाचे मागणीमुळे वनावरील वाढता भार कमी करणे तसेच खाजगी व सार्वजनिक वनेतर पडीक क्षेत्रावर वनीकरणाचा कार्यक्रम राबवून अधिकाअधिक क्षेत्र वृक्षाच्छादित करणे हा आहे. सामाजिक वनीकरण व वन विभाग ह्या दोन्ही शाखेंची उद्दिष्ट्ये ही परस्परपूरक आहेत. राष्ट्रीय वननीती १९८८ प्रमाणे राज्यातील एकूण भौगोलिक क्षेत्राचा ३३ टक्के भाग वृक्षाच्छादित करावयाचे झाल्यास वनविभागास त्याचे सध्याचे कार्यकक्षेतील क्षेत्राबाहेरील म्हणजे शासकीय वनेतर पडीक व शेतीसाठी उपयुक्त नसलेल्या खाजगी जमिनींवर मोठ्या प्रमाणावर वृक्ष लागवड व तत्सम कामे घेणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र राज्यात वन विभागाची क्षमता सामाजिक वनीकरण संचालनालयाच्या तुलनेत अधिक आहे. या दोन्ही यंत्रणा एकाच प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखाली आणल्यास त्यांच्यामध्ये चांगल्या प्रकारे समन्वय साधला जाऊन वनीकरणाचा कार्यक्रम अधिक कार्यक्षमतेने राबविता येईल. तसेच सामाजिक वनीकरण संचालयनालय, वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असल्यास राष्ट्रीय वननिती १९९८ व राज्यवन धोरण २००८ मध्ये दिलेल्या उद्देशाची पूर्तता करणे अधिक सुकर होईल. वन विभाग व सामाजिक वनीकरण विभागाचे एकत्रीकरणामुळे शासनावर अतिरिक्त वित्तीय भार पडणार नाही. तसेच कामामध्ये एकसूत्रता देखील राहील व वनेतर क्षेत्रावर वनीकरणाची कामे रोपवनाचे कार्य तसेच इतर वन संरक्षण कार्ये व पाणलोट विकासाची कामे प्रभावीपणे होतील.या सर्व बाबी विचारात घेऊन सामाजिक वनीकरण व वन विभाग एकत्रित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरून खालील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय –**

१) ग्राम विकास व जल संधारण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेले सामाजिक वनीकरण संचालनालयास महसूल व वन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात येत आहे. सामाजिक वनीकरण संचालनालयातील अधिपत्याखाली विविध संवर्गातील अधिकारी कर्मचारी सध्या ज्या वेतनश्रेणीमध्ये कार्यरत आहेत त्यांना ती वेतनश्रेणी यथास्थिती पूर्ववत लागू राहील.

२) मंत्रालय स्तरावरील, सामाजिक वनीकरण संचालनालयाशी निगडीत अधिकारी व कर्मचारी वर्ग यापुढे प्रधान सचिव (वने) यांच्या नियंत्रणाखाली राहील.

३) एकत्रीकरणानंतर सामाजिक वनीकरण संचालनालय हे पूर्ववत कार्यरत राहील व ते महासंचालक तथा प्रधान मुख्य वन संरक्षक ,सामाजिक वनीकरण यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली राहील.

४) ग्राम विकास व जल संधारण विभागाच्या स्तरावर सामाजिक वनीकरण संचालनालय हाताळणारा अधिकारी वर्ग (सहसचिव / उपसचिव, कक्ष

.अधिकारी) व इतर कर्मचारी महसूल व वन विभागाच्या मंत्रालयीन आस्थापनेवर हस्तांतरीत करण्याबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाने करावी.

५) सामाजिक वनीकरण संचालनालयासाठी सध्या जे लेखाशिर्ष उपलब्ध आहेत,त्या सर्व लेखाशिर्षासाठी अनुदान महसूल व वन विभागाव्दारे वितरीत केले जाईल.

सदर शासन निर्णय १ जानेवारी २०१५ पासून अमलात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०६१११६५८४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Pardeshi

Digitally signed by Pravin Pardeshi
DN: c=IN, o=All India Service, ou=Principle Secretary, postalCode=400021, st=Maharashtra, cn=Pravin Pardeshi
Date: 2014.12.06 11:24:27 +05'30'

**(प्रविण परदेशी)**
प्रधान सचिव (वने)

**प्रत–**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन मुंबई.
२) प्रधान सचिव,मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई
३) अपर मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई

४) सचिव (जल संधारण), ग्राम विकास व जल संधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
५) उपसचिव,मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय मंत्रालय,मुंबई
६) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)
७) खाजगी सचिव,मा.मंत्री (वने),मंत्रालय,मुंबई .
८) खाजगी सचिव,मा.मंत्री (गामविकास व जल संधारण) ,मंत्रालय,मुंबई .
९) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख) ,महाराष्ट्र राज्य, नागपुर
१०) प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) प्रधान मुख्य वन संरक्षक (वन्यजीव) ,महाराष्ट्र राज्य नागपुर
१२) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र वन विकास महामंडळ,नागपुर.
१३) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर
१४) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक तथा अतिरीक्त महासंचालक (प्रशासन), सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य , पुणे
१५) मुख्य वन संरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१६) उपसंचालक ,सामाजिक वनीकरण (सर्व)
१७) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) (सर्व)
१८) वनसंरक्षक (सर्व)
१९) उप वनसंरक्षक (सर्व)
२०) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा),मुंबई / नागपुर
२१) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे)
२२) महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
२३) निवड नस्ती(फ-५)